**बाष्पके संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहसंचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक बदल्या.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. बाष्पके-०४२३/प्र.क्र.७५/कामगार-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ जून, २०२३.

वाचा:- १."महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५"
२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १२१४/प्र.क्र.७४/ कामगार-१, दि. ०५.०२.२०१५

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) मधील तरतूदीनुसार खाली नमूद केलेल्या, बाष्पके संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहसंचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदलीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.सं.लो.कुंभलवार | सह संचालक, मैत्री कक्ष, मुंबई | सह संचालक, नाशिक (श्री.उ.ना.पाटील, सह संचालक, नाशिक यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त **सह संचालक यां**ना तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करुन, त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित

कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** (dies non) **म्हणून गणला जाईल.** याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारीत केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी/ कर्मचारी, विभागीय चौकशी नियमपुस्तिका १९९१ च्या प्रकरण-२ मधील कलम २.१ (२) (पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. वरील अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतूदीन्वये व सदर अधिनियमाच्या कलम ६ खालील परंतुक २ व कलम ७ एकत्रित विचारात घेऊन, संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये, सक्षम प्राधिकारी यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६२२१९०२३६४९१० असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.06.22 19:03:17 +05'30'

**( दिपक पोकळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, बाष्पके संचालनालय, ७ वा मजला, कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अध्यक्ष, मैत्री कक्ष तथा विकास आयुक्त (उद्योग),
द्वारा :- महाराष्ट्र स्टेट स्मॉल स्केल इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन (MSSIDC), कृपानिधी बिल्डींग, ९, वालचंद हिराचंद मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८
४. संबंधित अधिकारी (संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
५. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुदेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. उप सचिव (काम.-१)/अवर सचिव (काम.-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती.